**श्रीम. सरला मधुकर ढोके सहायक कार्यकारी अभियंता (स्था) यांच्या ज्येष्ठता दिनांकाबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**जलसंपदा विभाग**

शासन परिपत्रक क्रमांक : सकाज्ये २०२५/प्र.क्र.०३/आ(संनि),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ७ मार्च, २०२५

संदर्भ : १) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.न्यायाप्र -२०१९ /प्र.क्र.१०९/आ(संनि) दि.०१.०२.२०२३.
२) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सकाअज्ये२०१६/(३२/१६)/आ(संनि) दि.२७.१०.२०१६.
३) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. न्यायाप्र.२०२४/प्र.क्र.३८आ(संनि) दि.१४.०८.२०२४.
४) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सकाज्ये-२०१७/(५४/१७)/आ(संनि) दि.१५.११.२०१७.
५) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सकाज्ये -२०१८/(१२/१८)/आ(संनि) दि.०४.०५.२०१८.
६) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सकाज्ये -२०१९/प्र.क्र.१७/आ(संनि) दि.१५.०३.२०१९.
७) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सकाज्ये -२०२०/प्र.क्र.२२/आ(संनि) दि.०३.०२.२०२०.
८) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सकाज्ये -२०२१/प्र.क्र.०१/आ(संनि) दि.०२.०३.२०२१.
९) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सकाज्ये -२०२२/प्र.क्र.०१/आ(संनि) दि.१४.०३.२०२२.
१०) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र. सकाज्ये -२०२३/प्र.क्र.११/आ(संनि) दि.०९.०३.२०२३.

## शासन परिपत्रक

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात आलेल्या महाराष्ट्र अभियांत्रिकी स्थापत्य सेवा परीक्षा २०१३ मधून गुणवत्तेनुसार पात्र असूनदेखील शिफारस न झाल्यामुळे परीक्षेच्या निकालास आक्षेप घेऊन श्रीमती सरला मधुकर ढोके यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई, खंडपीठ नागपूर येथे मूळ अर्ज क्र.६६०/२०१५ दाखल केला होता. या मूळ अर्जान्वये त्यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या दिनांक १९.९.२०१४ च्या घोषणेस, तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगातर्फे महाराष्ट्र अभियांत्रिकी स्थापत्य सेवेतील गट-अ पदांसाठी घेण्यात आलेल्या सन २०१३ च्या परीक्षेच्या निकालास आक्षेप घेतला होता. सदर मूळ अर्ज मा.न्यायाधिकरणाने दिनांक १५.०३.२०१९ च्या आदेशान्वये खारीज केला.

श्रीमती ढोके यांनी मा.न्यायाधिकरणाच्या दिनांक १५.३.२०१९ च्या उक्त आदेशास मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर येथे आव्हान देण्याकरीता रिट याचिका क्र.५७२१/२०१९ दाखल केली होती. प्रस्तुत प्रकरणी दिनांक २५.०८.२०२१ रोजी मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने श्रीम. सरला मधुकर ढोके यांची विभागातील सहायक कार्यकारी अभियंता (स्था) या पदावर दि. ०८.०२.२०२२

रोजीच्या पत्रान्वये शिफारस केली असून संदर्भ क्र.१ अन्वये श्रीम. सरला मधुकर ढोके यांना विभागातील सहायक कार्यकारी अभियंता (स्था) पदावर नियुक्ती देण्यात आली आहे. श्रीम. सरला मधुकर ढोके यांच्या शिफारस पत्रामध्ये आयोगाने त्यांचे स्थान श्रीम.श्वेता योगेंद्र कुऱ्हाडे (गु.क्र.७४) यांच्या नंतर निश्चित केले आहे.

समांतर आरक्षण प्रकरणी न्यायालयीन निर्णयानुसार नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांची प्रकरणे ज्येष्ठतेबाबत अभिप्राय देण्यासाठी सामान्य प्रशासन विभागास सादर करण्यात आली होती. त्या अनुषंगाने जेष्ठतेबाबत विचाराधीन उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन विभागाने पुढीलप्रमाणे अभिप्राय दिले आहेत -

"ज्या उमेदवारांच्या बाबतीत मा.न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयास अंतिम स्वरूप प्राप्त झाले आहे, त्या उमेदवारांच्या बाबतीत मा. न्यायालयाच्या न्यायनिर्णयाची अंमलबजावणी केल्याखेरीज अन्य पर्याय नाही. सबब जलसंपदा विभागाने मा.न्यायालयाच्या न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करणे अभिप्रेत आहे."

सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या उपरोक्त अभिप्रायास अनुसरून श्रीम. सरला मधुकर ढोके सहायक कार्यकारी अभियंता (स्थापत्य), गट-अ यांची ज्येष्ठता महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा २०१३ मधील शिफारस केलेल्या उमेदवार श्रीम.कुऱ्हाडे श्वेता योगेंद्र (गु.क्र.७४), यांच्या नंतर दि. ०१.०१.२०१६ रोजी निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र. ४ ते १० येथील शासन परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या दि.१ जानेवारी रोजीच्या सन २०१७ ते २०२३ या कालावधीतील सहायक कार्यकारी अभियंता (स्था) या संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठता सूचीमध्ये श्रीम. सरला मधुकर ढोके यांच्या नावाचा समावेश खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| सहायक कार्यकारी अभियंत्याचे नांव : **श्रीम.सरला मधुकर ढोके** | | | |
|---|---|---|---|
| नेमणुकीचा दिनांक : **०१.०२.२०२३** | | | |
| ज्येष्ठता सूची | अनुक्रमांक | ज्येष्ठता यादीतील क्रमानंतर | ज्येष्ठता यादीतील क्रमापूर्वी |
| १ | २ | ३ | ४ |
| ०१.०१.२०१७ | ८७अ | श्रीम.श्वेता योगेंद्र कुऱ्हाडे यांच्या नंतर | श्रीम.सायली राजेंद्र पाटील यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०१८ | ८७अ | श्रीम.श्वेता योगेंद्र कुऱ्हाडे यांच्या नंतर | श्रीम.सायली राजेंद्र पाटील यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०१९ | ८७अ | श्रीम.श्वेता योगेंद्र कुऱ्हाडे यांच्या नंतर | श्रीम.सायली राजेंद्र पाटील यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०२० | ८७अ | श्रीम.श्वेता योगेंद्र कुऱ्हाडे यांच्या नंतर | श्रीम.सायली राजेंद्र पाटील यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०२१ | ६९अ | श्रीम.श्वेता योगेंद्र कुऱ्हाडे यांच्या नंतर | श्रीम.सायली राजेंद्र पाटील यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०२२ | ६९अ | श्रीम.श्वेता योगेंद्र कुऱ्हाडे यांच्या नंतर | श्रीम.सायली राजेंद्र पाटील यांच्या पूर्वी |
| ०१.०१.२०२३ | २अ | श्री.नरेंद्र बसवराज गुरव यांच्या नंतर | श्रीम.तारकेश्वरी दे. तायडे यांच्या पूर्वी |

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०३०७११५४१२६३२७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BAPUSAHEB RAMDAS SONAWANE

Digitally signed by BAPUSAHEB RAMDAS SONAWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=aa9f65e90f34e5648365a67ac974407846b2378509021d9a9b764788f91300c2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D6647630D541B9030FF94EF31AFD6FA8B275E0E15A69D5F68163604468DC5D6, cn=BAPUSAHEB RAMDAS SONAWANE
Date: 2025.03.07 11:55:21 +05'30'

**(बापूसाहेब सोनवणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीम. सरला मधुकर ढोके, सहायक कार्यकारी अभियंता (स्था), जलसंपदा विभाग.

प्रत :-

१) अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.

४) सर्व विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख, जलसंपदा विभाग.

५) मा.मंत्री, जलसंपदा (गोदावरी आणि कृष्णा खोरे विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.

६) मा.मंत्री, जलसंपदा (विदर्भ, तापी व कोंकण विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.

७) सह सचिव (सेवा)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग,

८) कक्ष अधिकारी, कार्यासन आ(वर्ग-१)/आ(वर्ग-२).
जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

९) संग्रहार्थ/कार्यासन आ(संनि).